**<u>नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना</u>**
**<u>मंजूर निधीच्या विनियोगाबाबत</u>**

# महाराष्ट्र शासन
# नगर विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-११९८/प्र.क्र.३०/नवि-०४

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २८ मार्च, २०२२

**<u>संदर्भ :-</u>**

१. शासन निर्णय, नगर विकास विभाग, समक्रमांक, दिनांक १२ मार्च,२०१८.
२. शासन निर्णय, नगर विकास विभाग,सम क्रमांक, दिनांक ४ जून,२०१८.
३. शासन निर्णय, नगर विकास विभाग, सम क्रमांक, दिनांक ९ ऑगस्ट,२०१८.
४. शासन निर्णय, नगर विकास विभाग, सम क्रमांक, दिनांक १५ डिसेंबर,२०१८.
५. शासन निर्णय, नगर विकास विभाग, सम क्रमांक, दिनांक १ जून,२०१९.
६. शासन निर्णय, नगर विकास विभाग, सम क्रमांक, दिनांक २६ फेब्रुवारी,२०२०.
७. शासन निर्णय, नगर विकास विभाग, सम क्रमांक, दिनांक ११ जुन,२०२०.
८. शासन निर्णय, नगर विकास विभाग, सम क्रमांक, दिनांक २१ मे,२०२१.

**<u>प्रस्तावना</u> :-**

नगर विकास विभागाकडून विविध योजनांतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या विनियोग विहित कालावधीत न केल्यामुळे अशा अखर्चित झालेल्या निधी संदर्भात करावयाच्या कार्यवाहीबाबतच्या सविस्तर सूचना व कालमर्यादा समक्रमांकाच्या संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१,२,३,४,५,६,७ व ८ अन्वये देण्यात आल्या आहेत.त्यामध्ये नमुद कालमर्यादेत सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

**सन २०१७-२०१८,२०१८-१९,२०१९-२० व २०२०-२०२१** या आर्थिक वर्षामध्ये वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने कामे पूर्ण करून निधी खर्च करण्यास दिनांक **३१ मार्च,२०२३** पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

**०२.** २०१६-१७ व त्यापुर्वीच्या वर्षात राज्यातील महानगरपालिका/ नगरपरिषदा/ नगरपंचायती यांना नगर विकास विभागामार्फत वितरीत करण्यात आलेल्या व अद्याप अखर्चित असलेल्या निधी तात्काळ शासनास जमा करण्यात यावा.

**०३.** संदर्भ क्र.१,२,३,४,५,६,७ व ८ येथील शासन निर्णयान्वये यापुर्वीच शासन जमा करण्यात आलेल्या निधीबाबत सदर आदेश लागु राहणार नाहीत.

**०४.** सदर निधी विहित मुदतीत खर्च करण्याची संयुक्त जबाबदारी संबधीत जिल्हाधिकारी, संबधीत आयुक्त/मुख्याधिकारी व संबधीत महापौर/नगराध्यक्ष यांची राहील.

**०५.** दिनांक **३१ मार्च,२०२३** अखेर खर्च न होणारा निधी तात्काळ शासन जमा करण्याची संयुक्त जबाबदारी संबधीत जिल्हाधिकारी, संबधीत आयुक्त/मुख्याधिकारी व संबधीत महापौर/नगराध्यक्ष यांची राहील.

**०६.** सदर शासन निर्णय वित्त विभाग, अर्थोपाय शाखेच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३१/ अर्थोपाय, दिनांक २२/०३/२०२२ नुसार सादर केलेल्या प्रस्तावावर शासनाने दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**०७.** हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२८१२३३२२१६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KUMBHAR VIVEK SHANKAR

Digitally signed by KUMBHAR VIVEK SHANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ef935067970760fbaec2fa421af2eac23d3b8737b990883be0d8ef292ba28a2f, pseudonym=91F84453C6751ACC71A07E96028FE77A7F8D811D, serialNumber=5E3716FD0FE61EE87305882BC35EE7E757293849E74351E2AB33E4EB40BFB646, cn=KUMBHAR VIVEK SHANKAR
Date: 2022.03.29 11:23:34 +05'30'

**(विवेक कुंभार)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव.
३. मा. मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव.
५. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (वित्तीय सुधार) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सचिव (व्यय) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

१०. महालेखापाल कार्यालय, महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर.
११. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
१२. सर्व विभागीय आयुक्त.
१३. आयुक्त, सर्व महानगरपालिका.
१४. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय, मुंबई.
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१६. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई उपनगर.
१७. सर्व उपप्रादेशिक संचालक नगर परिषद प्रशासन.
१८. सर्व जिल्हाधिकारी.
१९. अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान, मुंबई.
२०. सर्व जिल्हा प्रशासन अधिकारी.
२१. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी .
२२. मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा/ नगरपंचायती.
२३. निवडनस्ती, (नवि-०४) .

*****